**गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्याच्या विदयार्थी संख्येत वाढ करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०२२/प्र.क्र.१८८/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक: ३१ जुलै, २०२३.

**वाचा** : १) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२१८/तांशि-४, दि.०४ ऑक्टोबर, २०१८.
२) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.११६/तांशि-४, दि.०६ सप्टेंबर, २०२१.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.१७/तंशिसं/परदेशी शिष्यवृत्ती/२०२२/२११, दि.०२ डिसेंबर, २०२२.
४) दि.२१.०७.२०२३ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय.

**प्रस्तावना :-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत खुल्या प्रवर्गातील "गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती" योजना ही संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०४ ऑक्टोबर, २०१८ शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेतील लाभार्थ्यांच्या उत्पन्न मर्यादेत संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०६ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. राज्य मंत्रिमंडळाच्या दि.२७ सप्टेंबर २०२२ रोजीच्या बैठकीत खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय घटकातील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी परदेशात पाठवावयाच्या विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करण्याचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्याबाबत राज्य मंत्रिमंडळाचे निर्देश होते.

तद्अनुषंगाने तंत्र शिक्षण संचालनालयाने संदर्भाधीन क्र.३ येथील दि.०२ डिसेंबर, २०२२ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला. सदरचा प्रस्ताव राज्य मंत्रिमंडळ बैठकीच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता त्यास संदर्भाधिन क्र.४ येथील दि.२१.०७.२०२३ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत खुल्या प्रवर्गातील "गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती" योजना राबविण्यासंदर्भात संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०४ ऑक्टोबर, २०१८ शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेल्या व लाभार्थ्यांच्या उत्पन्न मर्यादेसंदर्भात संदर्भाधीन क्र.२

येथील दि.०६ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेल्या धोरणानुसार जे निकष विहित करण्यात आलेले आहेत, त्याच निकषांनुसार सदरची योजना यापुढेही राबविण्यात यावी.

२. सदर योजनेकरिता संदर्भाधीन दि.०४ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या निकषांमध्ये शासनाच्या मान्यतेने परिस्थितीजन्य आवश्यक ते बदल करण्याचे अधिकार विभागास राहतील.

३. शैक्षणिक वर्ष २०२३-२०२४ पासून संदर्भाधीन दि.४ ऑक्टोबर, २०१८ शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या सर्व शाखांमधील पदव्युत्तर पदवी व पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांची संख्या १० वरुन ३० व डॉक्टरेटकरिता १० विद्यार्थी अशा एकूण ४० विद्यार्थ्यांची शाखानिहाय विभागणी खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **शाखा / अभ्यासक्रम** | **पदव्युत्तर पदवी व पदव्युत्तर पदविका** | | **डॉक्टरेट** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|
| | | **विद्यमान विद्यार्थी संख्या** | **प्रस्तावित विद्यार्थी संख्या** | | |
| १. | कला | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| २. | वाणिज्य | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| ३. | विज्ञान | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| ४. | व्यवस्थापन | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| ५. | विधी अभ्यासक्रम | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| ६. | अभियांत्रिकी / वास्तुकला शास्त्र | ०४ | १२ | ०४ | १६ |
| ७. | औषधनिर्माणशास्त्र | ०१ | ०३ | ०१ | ०४ |
| | **एकूण** | **१०** | **३०** | **१०** | **४०** |

४. या योजनेसाठी अपेक्षित असलेला रु.९.०० कोटी एवढ्या अतिरिक्त आवर्ती खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरचा खर्च हा खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र.डब्ल्यू-३,
मुख्य लेखाशिर्ष २२०३-तंत्रशिक्षण,
१०७, शिष्यवृत्त्या,
(००)(००)(१०) गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणे (कार्यक्रम) (२२०३ ३५५१)
३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८१/१४७१ दि.२१.०२.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२३/व्यय ५, दि.०६.०४.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०७२५१६०५५८९८०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=21524D9E84E57776BA1EE448660F3699BDD08917801A19974A72D568F57F5401, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2023.08.01 14:37:40 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
५. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
६. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
८. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व सन्मानीय विधानपरिषद व विधानसभा सदस्य
११. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१३. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा तथा सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई ४०० ००१
१४. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई ४०० ००१
१५. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९,खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१६. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१९. आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३. कुलगुरु, सर्व विद्यापीठे
२४. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.मागणगांव, जि.रायगड
२५. कुलगुरु,महाराष्ट्र राज्य आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
२६. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परीक्षा मंडळ, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
२७. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
२८. सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये (सर्व)
२९. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३६. सर्व संबंधित मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
३७. उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. सर्वसंबंधित कार्यासने (तांशि-३/विशि-३/मशि-२/मशि-४/तांशि-५/तांशि-६/साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३९. निवडनस्ती/तांशि-४.